भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २७५(१)
अंतर्गत अनुदान सन २०१४-१५ मार्गदर्शक
तत्वांना मंजूरी देणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः केंद्रीय-२०१५/प्र.क्र.३३/का-१९**
मंत्रालय, मुंबई ४०००३२
तारीख: १०/०६/२०१५

**वाचा-**

१) आदिवासी विकास विभागाचे पत्र क्र.केंद्रीय २०१४ /प्र.क्र.६२/का-१९ दि.०६/०८/२०१४
२) जनजाती कार्य मंत्रालय,नवी दिल्ली यांचे पत्र क्र.F.No.११०१५/१६(१४))/२०१४-SG-II, दि.३०/१२/२०१४
३) आयुक्त,आदिवासी विकास,नाशिक यांचे पत्र क्र.भासंअनु-२०१५/प्र.क्र.०५/का.८(४), दि.०८/०३/२०१५

**प्रस्तावना -**

राज्य शासनाच्या दि. ०६/०८/२०१४ च्या प्रस्तावास अनुसरुन केंद्र शासनाने त्यांच्या भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २७५(१) अंतर्गत अनुदान या योजनेखाली सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात पुढील योजनांकरीता एकुण ११७०१.३० लक्ष निधी वितरीत केला आहे.

| अ. क्र. | योजनेचे नाव | मंजूर निधी (रु. लाखात) |
|---|---|---|
| १. | Watershed Development | 1600.00 |
| २. | Tourism Development- Construction of yatri niwas at Gaymukh in Tal.Tumsar,Dist. Bhandara | 10.00 |
| ३. | Tourism Development -Kachargad Devasthan | 100.00 |
| ४. | Tourism Development- Construction of yatri niwas at Kuvara bhivsen Devasthan in Bhivgadh, Tal.Parshivani, Dist. Nagpur. | 250.00 |
| ५. | Construction of wall compounds to Govt. Ashram schools | 1500.00 |
| ६. | Roads and bridges | 1000.00 |
| ७. | Construction of building for Gondawana Museum and Cultural Center, Nagpur | 1000.00 |
| ८. | Research Studies (TRTI) Ethnographic Study of 17 tribes | 100.00 |
| ९. | Mobile active Library for Ashram schools | 27.00 |
| १०. | Institution Strengthening of TRTI & ITDPs | 1468.17 |
| ११. | Monitoring and Evolution | 229.17 |
| १२ | Balance grant for Construction of 4 EMRS sanctioned in 2013-14<br>Hilly-1. Nandurbar, Tal / Dist. Nandurbar<br>2. Pimprisadruddin, Tal. Igatpuri, Dist. Nasik | 1200.00 |
| १३. | Construction of 3 New EMRS (2 Hilly area & 1 Plain)<br>1. Shendgaon (Bhatsanagar) Tal. Shahapur, Dist. Thane (Plain)<br>2. Ajmer Saundane, Tal. Satana, Dist.Nasik (Hilly area)<br>3. Maveshi(Rajur), Tal.Akole, Dist. Ahmadnagar (Hilly area) - | 2000.00 |
| १४. | Recurring grants for8 EMRS Rs.42000/student (1920 students) | 806.40 |
| १५. | Recurring grants for 4 EMRS -(Nasik, kambalgaon, chikhaldara, khairiparsoda) Started In the year 2001-10% additional grant to compensate inflation Rs.42000/student +10% (1680 students) | 70.56 |

| | | |
|---|---|---|
| १६. | Recurring grants for 4 EMRS (Nasik, kambalgaon, chikhaldara, khairiparsoda) Started In the year 2001 for procurement of Furniture essential for kitchen,dining@10.0lakh/EMRS | 40.00 |
| १७. | setting up Three new Micro Project Agencies in PvTG dominated areas of the State | 300.00 |
| | एकुण | 11701.30 |

वितरीत निधीतून अनुसुचीत जमातीचे आरध्य दैवत कुवाराभिवसेन मु.भिवगड, ता. पारशिवनी जि.नागपूर येथे यात्री निवास बांधकाम करणे.या योजनेच्या मार्गदर्शक सूचनांना मंजूरी देण्याचा प्रश्नशासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय-

या निर्णयाद्वारे सोबत जोडलेल्या परिशिष्टानुसार खालील योजनांच्या/कामांच्या अंमलबजावणीसाठी मार्गदर्शक सूचनांना मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | योजनेचे नाव | मंजूर निधी (रु. लाखात) |
|---|---|---|
| १. | कुवाराभिवसेन मु.भिवगड, ता. पारशिवनी, जि.नागपूर येथे यात्री निवास बांधकाम करणे.<br>(Tourism Development- Construction of yatri niwas at Kuvara bhivsen Devasthan in Bhivgadh, Tal.Parshivani, Dist. Nagpur.) | २५०.०० |
| | एकुण | २५०.०० |

सदर मार्गदर्शक सूचनांनुसार वितरीत तरतूदींच्या मर्यादेत योजना राबविण्याबाबत त्वरीत कार्यवाही करण्यात यावी व त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र आर्थिक व भौतिक अहवालासह शासनास सादर करण्याची दक्षता घ्यावी. तसेच ज्याप्रकरणी प्रशासकीय मान्यता घेण्यांची आवश्यकता असेल ती प्रकरणे स्वतंत्रपणे शासन मान्यतेसाठी सादर करावीत.

३. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६१७१७१८०५९९२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Manojkumar Gorakh Mahale

Digitally signed by Manojkumar Gorakh Mahale
DN: CN = Manojkumar Gorakh Mahale, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Tribal Development Department
Date: 2015.06.17 17:20:04 +05'30'

**मनोजकुमार महाले**
कार्यासन अधिकारी

**प्रत,**

१. मा.मंत्री आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, यांचे खाजगी सचिव ,मंत्रालय,मुंबई
२. मा.राज्यमंत्री आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. स्वीय सहायक,मा.प्रधान सचिव,आदिवासी विकास,मंत्रालय,मुंबई

४. सार्वजनिक बांधकाम विभाग / नियोजन विभाग / वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
५. आयुक्त,आदिवासी विकास,महाराष्ट्र राज्य,नाशिक
६. उपसचिव,आदिवासी विकास,मंत्रालय,मुंबई
७. संगणक समन्वयक,आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
८. निवड नस्ती (का.१९) आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई

# परिशिष्ट-०१

भारतीय संविधानाचे अनुच्छेद २७५(१) अंतर्गत प्रस्तावित योजना सन-२०१४-१५

| | | |
|---|---|---|
| १. | योजनाचे नाव | अनुसूचित जमातीचे आराध्य दैवत कुवारा भिवसन मु.भिवगड ता.पारशिवनी,जि.नागपूर येथे यात्री निवास बांधकाम करणे |
| २. | योजनेसाठी येणा-या खर्चाचे सविस्तर अंदाजपत्रक | मौजा भिवगड ता.पारशिवनी जि.नागपूर या गांवासाठी रु.२५०.०० लक्ष प्रमाणे खर्च अपेक्षीत आहे. यामध्ये भक्त निवास बांधकाम, गार्ड खोली, सुरक्षा भिंत, शौचालय बाथरुम साठी टँक, अंतर्गत रस्ते, नाली बांधकाम, सायकल स्टॅन्ड, पाण्यासाठी टयुबवेल, सोलर वॉटर हिटर, पलंग, गादी, उशी, चादर, अंतर्गत विद्युत व्यवस्था, पंखे, दरवाजे, खिडक्या, तसेच सुरक्षा भिंतीला गेट यांचा खर्च अंतर्भूत आहे. |
| ३. | अंमलबजावणी अधिकारी | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प नागपूर व प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार (PMC). |
| ४. | योजना राबविणारी यंत्रणा | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प नागपूर व प्रकल्पव्यवस्थापन सल्लागार (PMC). |
| ५. | नियंत्रक अधिकारी | अपर आयुक्त, आदिवासी विकास, नागपूर |
| ६. | योजनेचा उद्येश/हेतु | नागपुर जिल्हयातील मौजा कुवारा भिवसन (भिवगड) ता.पारशिवनी जि.नागपूर येथे कुवारा भिवसन नावांनी दैवत असून चैत्र पंचमी ते पुढील १० दिवस मोठी यात्रा भरत असून मोठया प्रमाणात आदिवासी समाजाची गर्दी असते. या ठिकाणी यात्रेमध्ये येणा-या भाविकांना राहण्याची कोणतीही सोय नसल्याने भाविकांची गैरसोय होत असते. तसेच सदरचे देवस्थानावरने रोज भाविक दर्शनाला येत असतात. वरील अडचणी बघता तेथे यात्री निवास बांधकाम केल्यास भाविकांची होणारी गैरसोय दूर होऊन पर्यटनासाठी तसेच भाविकांसाठी राहण्याची सोय होईल. सदर गांव हे संपूर्णत: आदिवासी समाजाचे वास्तव्य असल्याने आदिवासी समाजाची गैरसोय होऊ नये यासाठी त्यांना यात्री निवास बांधून देणे व त्याठिकाणी मुलभूत सोयी सुविधा निर्माण करणे हा योजनेचा मुख्य उद्येश आहे. |
| ७. | योजना राबविण्याची कार्यपध्दती | सदरची योजना प्रकल्प अधिकारी हे एकलव्य सोसायटी अंतर्गतच्या प्रकल्प व्यवस्थापन सल्लागारामार्फत राबवतील. प्रकल्प व्यवस्थापन सल्लगार यासंबधी सविस्तर आराखडे तयार करुन क्षेत्रिय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अधिकाऱ्याकडून तांत्रिक तपासणी करुन शासन मान्यतेसाठी सादर करतील प्रस्तावास प्रशासकीय मान्यता मिळाल्यानंतर विहीत प्रक्रियेचा अवलंब करुन |

| | | |
|---|---|---|
| | | (इ निविदा) प्रकल्पाचे काम पूर्ण करण्यात येईल. बांधकाम करताना गुणवत्तेची तपासणी सार्वजनिक बांधकाम विभागाच्या संबंधीत यंत्रणेकडून करुन घेण्याची जबाबदारी PMC ची राहील.<br><br>प्रकल्प अधिकारी हे महसूल विभागाकडून प्रस्तावित यात्री निवास व अनुषंगीक बांधकामां करीता जागा उपलब्ध करुन घेतील. योजनेचे काम पुर्ण झाल्यानंतर प्रकल्प अधिकारी हे यात्रीनिवास स्थाने व इतर वास्तु हया देवस्थान समिती नोंदणीकृत असल्यास त्यांचेकडे वर्ग करण्यात येईल. व पुढील देखभाल व दुरुस्तीचे काम हे सदर संस्थानाचे राहील. जर देवस्थान समिती नोंदणीकृत नसल्यास सदर वास्तु स्थानिक ग्रामपंचायतकडे वर्ग करण्यात येईल व पुढील देखभाल व दुरुस्तीचा खर्च संबंधीत ग्रामपंचायत करेल. |
| ८. | योजनेच्या अटी व शर्ती | १. मंजूर निधीच्या मर्यादितच काम पुर्ण करणे बंधनकारक राहील. त्याकरीता केंद्रशासनाचा अतिरिक्त निधी पुन:श्च मंजुर केला जाणार नाही.<br>२. निवडलेले क्षेत्रा (गांव) मध्ये प्रस्तावित कामे एक वर्षाच्या आंत पुर्ण करण्यात येईल.<br>३. निवड करण्यात आलेल्या शासकीय यंत्रणेस कामाच्या प्रगती नुसार टप्पा टप्प्याने निधी अदा करण्यात येईल.निधी अदा करण्यापूर्वी झालेल्या कामाच्या गुणवत्तेला वन सार्वजनिक बांधकाम विभागतयार यंत्रणेकडून गुणवत्तापूर्ण काम /ाबाबत प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक राहील.<br><br>४. कामाची रुपरेषा शासकीय यंत्रणेस कळविण्यात येईल त्याप्रमाणे टप्प्या टप्प्याने कामे पुर्ण करण्यात येईल.<br>५. कार्यान्वित यंत्रणेद्वारे केलेल्या कार्यवाहीचा/ कामाचा प्रगती अहवाल व खर्चाचा अहवाल तसेच जो निधी प्रदान करण्यात आलेला आहे त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करणे बंधनकारक राहील. सदर अहवाल व प्रमाणपत्र न दिल्यास पुढील रक्कमेचा हप्ता अदा करण्यात येणार नाही. अशी अट करारनाम्यात नमुद करण्यात येईल.<br>६. प्रस्तूत कामाच्या ठिकाणी दर्शनी भागात आदिवासी विकास विभाग नागपुर मार्फत केंद्रशासनाच्या निधीतून भारतीय संविधानाचे अनुच्छेद २७५(१) अंतर्गत योजना अशा आशयाचे नामफलक लावण्यात येईल.<br>७. ही योजना राबविणा-या यंत्रणेबरोबर समन्वय, मार्गदर्शक व योजनेचे सनियंत्रण करण्याची जबाबदारी प्रकल्प अधिकारी, अपर आयुक्त व प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार समिती यांची राहील.<br>८. योजना पुर्ण झाल्यानंतर देखरेख व दुरुस्तीसाठी संपुर्ण संकुल स्थानिक समितीच्या ताब्यात देण्यात येईल.<br>९. पुढील देखभाल व दुरुस्ती देवस्थान समितीद्वारे करण्यात येईल. |
| ९. | योजनेचे संनियंत्रण व मुल्य मापन | १) सदर योजनेमुळे देवस्थान समितीच्या उत्पन्नात झालेल्या वाढीचा संपुर्ण तपशिल देवस्थान समितीने ठेवणे आवश्यक आहे.<br>२) सदर योजनेचे पर्यवेक्षण प्रकल्प अधिकारी यांनी करावे. |